**विश्व मराठी साहित्य संमेलन, वाशी नवी मुंबई येथे सांस्कृतिक कार्य विभागाच्या वतीने चित्ररथाचे संचलनासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४ /प्र.क्र.८०/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ मार्च, २०२४

**वाचा :-** सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ १०५५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव" च्या निमित्ताने नियमित कार्यक्रमांसमवेत विविध नाविन्यपूर्ण कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत आहेत. याचपार्श्वभूमीवर विश्व मराठी साहित्य संमेलन, वाशी नवी मुंबई येथे सांस्कृतिक कार्य विभागाच्या वतीने संमेलनात चित्ररथाचे संचलन करण्यात आले. त्यानुषंगाने येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विश्व मराठी साहित्य संमेलन, वाशी नवी मुंबई येथे सांस्कृतिक कार्य विभागाच्या वतीने संमेलनात चित्ररथाचे संचलन करण्यासाठी येणारा खर्च रुपये ८,८०,०००/- (रुपये आठ लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१९१५०६१०८२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.19 15:15:20 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.निवड नस्ती, सां.का.४